पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (खुद्द) करीता Manage My lawsuits ही वेब आधारीत प्रणाली राबविण्यास मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः संगणक २०२१/प्र.क्र.१२/संगणक**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: १० फेब्रुवारी,२०२२

वाचा-

१. **मे.एम.एम.एल.टेक्नॉलॉजीज प्रा.लि. यांचा प्रस्ताव दि.०९.१२.२०२१**
२. **पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.०६.०१.२०२२ च्या बैठकीचे इतिवृत्त**
३. **मे.एम.एम.एल.टेक्नॉलॉजीज प्रा.लि. यांचा सुधारीत प्रस्ताव दि.२७.०१.२०२२**

प्रस्तावना-

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांच्या तसेच आस्थापना विषयक बाबींच्या अनुषंगाने विविध न्यायालयीन प्रकरणे उद्भवत असतात. विभागातील अधिकारी - कर्मचारी यांच्याकडे असलेल्या नियमित कामकाजा व्यतिरीक्त उद्भवत असलेल्या न्यायालयीन प्रकरणांमुळे कामकाजात अधिकाधिक भार येतो. यामुळे न्यायालयीन प्रकरणात दुर्लक्ष होऊन विपरीत परिस्थिती (अवमान याचीका इ...) निर्माण होण्याची शक्यता नाकारता येत नाही. सदर बाब लक्षात घेऊन विभागातील न्यायालयीन प्रकरणे प्रभावीपणे व जलदरीत्या हाताळणे शक्य व्हावे यासाठी संदर्भ क्रमांक २ अन्वये मे.एम.एम.एल.प्रा.लि. यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावानुसार “मँनेज माय लॉसुट” या कंपनीने विकसीत केलेली वेब आधारीत प्रणाली विभागात कार्यान्वयीत करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव विभागाच्या दिनांक ०६.०१.२०२२ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत सादर करण्यात आला होता.

प्रकल्प अंमलबजावणी समितीने “मँनेज माय लॉसुट” ही वेब प्रणाली १५ महिन्याकरीता कार्यान्वीत करण्याबाबत सदर बैठकीत मान्यता दिली. सदर बैठकीचे इतिवृत्त संदर्भाधिन क्रमांक २ अन्वये निर्गमीत करण्यात आले आहे. प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिलेल्या मान्यतेनुसार मे.एम.एम.एल.प्रा.लि. कंपनीने विकसीत केलेली वेब आधारीत “मँनेज माय लॉसुट” ही प्रणाली पाणी

पुरवठा व स्वच्छता विभागात १५ महिन्याकरीता कार्यन्वीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

या शासन निर्णयाव्दारे मे.एम.एम.एल.प्रा.लि. कंपनीने विकसीत केलेली वेब आधारीत “मँनेज माय लॉसुट” ही प्रणाली पाणी पुरवठा व स्वच्छता विभागात १५ महिन्याकरीता लागू करण्यास मान्यता देत आहे. सदर प्रणाली विभागातील ३० अधिकाऱ्यांना वापरात आणण्यासाठी ३० लायसन्स १५ महिन्याकरिता खालीलप्रमाणे खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | दर | एकुण किंमत |
|---|---|---|
| १ | प्रती अनुज्ञाप्ती (License) रु.८,५००/- (संख्या ३०) | रु.२,५५,०००/- |
| २ | One time implementation, training, set up charges | रु.५०,०००/- |
| ३ | Man Power (per month - २०,०००/-) | रु.३,००,०००/- |
| ४ | IGST (18%) | रु.१,०८,९००/- |
| | **एकुण** | **रु.७,१३,९००/-** |

**<u>Terms of Payment</u>**

**Software Services-**

1. 90 % at the time of agreement
2. 10% post successful completion of 15 months

**Manpower Services -** Every six months (first tranche within 30 days from the date of joining of resource)

०२. उपरोक्त खर्च मागणी क्रमांक “वाय-५-३४५१ सचिवालय आर्थिक सेवा (००) ०९० सचिवालय (०२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (०२) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकरणाची अंमलबजावणी (३४५१ २७६४) - १७ “संगणक खर्च” या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. सदर रक्कम खर्ची टाकण्यासाठी अवर सचिव, रोख शाखा, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग मंत्रालय,मुंबई यांना “आहरण व संवितरण” अधिकारी तसेच उप सचिव, रोख शाखा, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग मंत्रालय,मुंबई यांना “नियंत्रक” अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय हा वित्तीय अधिकार नियम पुस्तीका, १९७८ भाग पहिला, उप विभाग दोन, अनुक्रमांक २७-अ, नियम क्रमांक ७६ मधील स्तंभ क्रमांक ६ मधील अटींची पूर्तता होत आहे असे प्रमाणित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१०१६३०११२१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saroj Rajesh Deshpande

Digitally signed by Saroj Rajesh Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6a31a46110f5bc3d6fc7bdf1d6619a227d04e20859a66b7faddf9190ac096802, cn=Saroj Rajesh Deshpande
Date: 2022.02.10 18:16:06 +05'30'

**(सरोज देशपांडे)**
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२. सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सह सचिव/उप सचिव, वित्त/नियोजन/माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४. उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, नोंदणी शाखा/रोख शाखा, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
५. निवडनस्ती - संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.